महाराष्ट्र - कर्नाटक सीमावादाबाबत मा.सर्वोच्च न्यायालयात दाखल दावा क्र.४/२००४ -

श्री.संतोष काकडे यांची सहायक वकील म्हणून नियुक्ती तसेच व्यावसायिक फी व इतर सुविधाबाबत मंजुरी देणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग,**
**शासन आदेश क्रमांक : मकसी-१४१६/२६५/प्र.क्र.७८/२०१६/३६,**
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
**दिनांक : १७ मे, २०१७**

संदर्भ : १. शासन आदेश, सामान्य प्रशासन विभाग क्र. मकसी-१४१५/प्र.क्र.१/२०१५/३६, दि.२२ जानेवारी २०१५.
२. शासन शुध्दिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग क्र. मकसी-१४१५/प्र.क्र.१/२०१५/३६, दि.१२ जून, २०१५.
३. शासन आदेश, सामान्य प्रशासन विभाग क्र. मकसी-१४१५/प्र.क्र.१/२०१५/३६, दि.१९ मे, २०१५.
४. शासन आदेश, सामान्य प्रशासन विभाग क्र. मकसी-१४१५/प्र.क्र.१/२०१५/३६, दि.२३ सप्टेंबर, २०१५.

## आदेश

महाराष्ट्र - कर्नाटक सीमा प्रश्नासंदर्भात मा.सर्वोच्च न्यायालयात महाराष्ट्र शासनाने दावा क्र. ४/२००४ चे कामकाज गतिमानतेने करण्यासाठी जुने महाराष्ट्र सदन, नवी दिल्ली येथील विशेष कक्षात (Special Cell) सर्व वरिष्ठ वकील व सहायक वकील यांना दाव्याच्या कामकाजाच्या अनुषंगाने आवश्यक असलेल्या नोट्स आणि चार्ट तयार करणे, दैनंदिन कामकाजानुसार माहिती प्रदान करणे, इत्यादी न्यायिक कामकाज करण्यासाठी **ॲड.संतोष काकडे** यांची **कनिष्ठ सहायक वकील** म्हणून संदर्भाधीन दिनांक २२/०१/२०१५ च्या शासन आदेशान्वये नियुक्ती करण्यात आली होती. तसेच संदर्भाधीन दिनांक २३/०९/२०१५ च्या शासन आदेशाद्वारे सदर नियुक्ती त्यांची **कनिष्ठ सहायक वकील म्हणून काम करण्यासाठी असलेली इच्छुकता** अथवा **सदर प्रकरणी शासनास त्यांच्या सेवेची वाटत असलेली आवश्यकता, यापैकी जे आधी होईल तोपर्यंत** वाढविण्यास मंजुरी देण्यात आलेली आहे. ॲड.संतोष काकडे यांनी दि.०१ सप्टेंबर, २०१६ च्या पत्रान्वये या दाव्याकरिता पूर्णवेळ देऊ शकत नसल्याने दि.३० सप्टेंबर, २०१६ पासून त्यांना कनिष्ठ सहायक वकील म्हणून या दाव्यामधून मुक्त करण्याबाबत, तसेच सदर दाव्यामध्ये शासनास त्यांच्या सेवा आवश्यक असल्यास दि.०१ऑक्टोबर, २०१६ पासून सुधारित व्यावसायिक फी व इतर सोयी सुविधाबाबतच्या मागणीनुसार दाव्याच्या आवश्यकतेनुसार कामकाज करण्यास तयार असल्याचे कळविले. त्यावर **मा.मुख्य सचिव यांचे अध्यक्षतेखाली दि.२७ ऑक्टोबर, २०१६ रोजी झालेल्या बैठकीतील निर्णयानुसार श्री.काकडे यांच्या सेवा कार्यमुक्त न करता त्यांच्या मागणीनुसार त्यांना सुधारित व्यावसायिक फी व इतर सोयी सुविधा देण्यास** मंजुरी देण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

२. सबब, या शासन आदेशाद्वारे, महाराष्ट्र - कर्नाटक सीमा प्रश्नासंदर्भात मा.सर्वोच्च न्यायालयात महाराष्ट्र शासनाने दाखल केलेला दावा क्र. ४/२००४ चे कामकाज पहाण्यासाठी वकीलांच्या टिम मध्ये (Battery of Advocates) **ॲड. श्री.संतोष काकडे, यांना दि. ०१ ऑक्टोबर, २०१६ पासून सहायक वकील** म्हणून नियुक्ती करण्यात येत आहे. सदर कामकाजासाठी त्यांना खालीलप्रमाणे **व्यावसायिक फी व इतर सोयी सुविधा** उपलब्ध करण्यास याद्वारे शासन मान्यता देण्यात येत आहे.

**A. PROFESSIONAL FEES**

- Professional fees per conference with concern advocates : Rs.25,000/-
- Professional fees per conference with witnesses : Rs.25,000/-
- Fees per appearance : Rs.25,000/-
- Fees for research : Rs.25,000/- per day
- Any work which involves a commitment for a day : Rs.25,000/-

**B. OUT OF POCKET ACTUAL EXPENSES**

**(a) Travelling and Accommodation Expenses**

- Air Travel (Economy Class) from Pune to Delhi (To and Fro) and to any other destination if required
- Free of cost accommodation at Maharashtra Sadan during stay in Delhi
- Travelling to Mumbai, Kolhapur, Belgaum and other locations by car and accommodation at these places
- Other connecting travelling expenses

**(b) Typing, Photostat, Secretarial assistance and other miscellaneous expense.**

These actual expenses will be borne by State Government and memos will be submitted in due course.

३. वरीलप्रमाणे होणारा खर्च "मागणी क्रमांक ए-४, २०५२-सचिवालय- सर्वसाधारण सेवा-०९०-सचिवालय (००) (०१) सामान्य प्रशासन विभाग, २८-व्यावसायिक सेवा - योजनेतर दत्तमत **(२०५२००२५)"** या अर्थसंकल्पीय लेखाशीर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा व **दरवर्षीच्या** मंजूर तरतुदीतून भागविण्यात यावा.

४. मंजूर रकमेचा धनादेश Santosh Shivaji Kakade या नावाने काढण्यात यावा.

५. हे आदेश विधी व न्याय विभागाने त्यांच्या अनौपचारिक संदर्भ क्र. ३१५-२०१७/E, दि.१३/०४/२०१७ अन्वये दिलेल्या सहमतीने व वित्त विभागाने त्यांच्या अनौपचारिक संदर्भ क्र.२८६/२०१७/व्यय-४, दि.०४/०५/२०१७ अन्वये दिलेल्या संमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहेत.

सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०६१९१६४७४१७३०७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Sanjay Krishna Bhosale

Digitally signed by Sanjay Krishna Bhosale
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=General Administration Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=68fad25d7626a3cc798a2cdee2480a108e46d2bc3c24f98d38cc78723fe79c0f, cn=Sanjay Krishna Bhosale
Date: 2017.06.19 16:44:36 +05'30'

**( सं. कृ. भोसले )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. महालेखापाल-१ (लेखा व परिक्षा), महाराष्ट्र, मुंबई.
२. महालेखापाल-१ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, मुंबई.
३. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.

**४.** निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई.
**५.** प्रधान सचिव व निवासी आयुक्त, महाराष्ट्र सदन, कोपर्निकस मार्ग, नवी दिल्ली-११०००१.
**६.** अवर सचिव, विधी व न्याय विभाग (ई-शाखा), मंत्रालय, मुंबई-४०००३२.
**७.** अवर सचिव, वित्त विभाग (व्यय-४), मंत्रालय, मुंबई-४०००३२.
**८.** अवर सचिव, सामान्य प्रशासन विभाग (कार्यासन-२५), मंत्रालय, मुंबई-४०००३२.
**९.** अवर सचिव, सामान्य प्रशासन विभाग (कार्यासन-२६), मंत्रालय, मुंबई-४०००३२.
**१०.ॲड.शिवाजी एम. जाधव,** ॲडव्होकेट ऑन रेकॉर्ड, "आदित्य व्हीला", ए-८०, सेक्टर-१४, नॉयडा-२०१३०१.
**११.ॲड. संतोष शिवाजी काकडे,** ६२९/३ बी, दिपाली अपार्टमेंट, बिबवेवाडी, पुणे-४११०३७.
**१२.** निवड नस्ती (साप्रवि/३६)